महासंचालक(न्यायिक व तांत्रिक),महाराष्ट्र राज्य यांच्या अधिनस्त संचालक,न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील प्रयोगशाळांमधील संगणक गुन्हे,टेप ऑथेंटिकेशन व स्पीकर आयडेंटिफिकेशन तसेच मानसशास्त्र विभागातील करार पध्दतीने भरण्यात आलेल्या १६४ पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक एफएसएल-०४१७/प्र.क्र.३८८/पोल-४,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :-१६ ऑगस्ट, २०१७.**

**संदर्भ :** १) शासन निर्णय,गृह विभाग, क्र.एफएसएल-०४१४/प्र.क्र.३४४/पोल-४, दि.२३.८.२०१६.
२) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.मुं/का/४५६७-६८/१७, दि.५.७.२०१७.

**शासन निर्णय :-**

महासंचालक (न्यायिक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य,मुंबई यांच्या अधिनस्त संचालक,न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या आस्थापनेवरील प्रयोगशाळांमधील संगणक गुन्हे,टेप ऑथेंटिकेशन व स्पीकर आयडेंटिफिकेशन तसेच मानसशास्त्र विभागातील १६४ पदे संदर्भांकित क्र. १ अन्वये सावधी करार पध्दतीने भरण्यात आले होते. सदर खाली नमूद केलेल्या १६४ पदांचा करारा पध्दतीने नियुक्तीचा विद्यमान कालावधी संपुष्टात आल्यानंतर १ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन त्यापुढील ११ महिन्यांसाठी मुदतवाढ देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

<table>
<tr><th>अ. क्र.</th><th>विभागाचे नांव</th><th>पदनाम</th><th>पदसंख्या</th><th>सा.प्र.विभागाने विहित केलेले आरक्षण</th><th>वित्त विभागाने मंजूर केलेले मानधन रू.</th></tr>
<tr><td rowspan="2">१</td><td rowspan="2">संगणक गुन्हे, मुंबई प्रयोगशाळा</td><td>वैज्ञानिक अधिकारी, गट (ब)</td><td>१५</td><td rowspan="4"><u>वैज्ञानिक अधिकारी, गट (ब)</u><br>अजा-४, अज-२, विजा(अ)-१, भज (ब)-१, भज (क)-१, विमाप्र-१, इमाव-५, खुला-१४<br>--------------------------<br><u>वैज्ञानिक सहायक, गट (क)</u><br>अजा-४, अज-२, विजा(अ)-१, भज (ब)-१, भज (क)-१, विमाप्र-१, इमाव-५, खुला-१४</td><td>२१,०००/-</td></tr>
<tr><td>वैज्ञानिक सहायक, गट (क)</td><td>१५</td><td>१८,०००/-</td></tr>
<tr><td rowspan="2">२</td><td rowspan="2">संगणक गुन्हे, मुंबई,नागपूर व पुणे प्रयोगशाळा</td><td>वैज्ञानिक अधिकारी, गट (ब)</td><td>१४</td><td>२१,०००/-</td></tr>
<tr><td>वैज्ञानिक सहायक, गट (क)</td><td>१४</td><td>१८,०००/-</td></tr>
<tr><td colspan="3">एकूण -अ</td><td>५८</td><td colspan="2"></td></tr>
</table>

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३ | मानसशास्त्र, मुंबई प्रयोगशाळा | वैज्ञानिक अधिकारी, गट (ब) | २ | अजा-१, खुला-१ | २१,०००/- |
| | | **एकूण-ब** | **२** | | |
| ४ | टेप ऑथेंटिकेशन व स्पीकर आयडेंटिफिकेशन, मुंबई, नागपूर, पुणे, औरंगाबाद, नाशिक व अमरावती | वैज्ञानिक अधिकारी, गट (ब) | ५२ | **वैज्ञानिक अधिकारी, गट (ब)** अजा-७, अज-४, विजा(अ)-२, भज (ब)-१, भज (क)-२,भज (ड)-१, विमाप्र-१, इमाव-९, खुला-२५ | २१,०००/- |
| | | वैज्ञानिक सहायक, गट (क) | ५२ | **वैज्ञानिक सहायक, गट (क)** अजा-७, अज-४, विजा(अ)-२, भज (ब)-१, भज (क)-२,भज (ड)-१, विमाप्र-१, इमाव-९, खुला-२५ | १८,०००/- |
| | | **एकूण-क** | **१०४** | | |
| | | **एकूण पदे (अ+ब+क)** | **१६४** | | |

२. सदर शासन मान्यता खालील अटींच्या अधीन राहील.

(अ) उपरोक्त पदांवरील नियुक्त्या ११ महिन्यांसाठी किंवा सदर पदांवर नियमित नियुक्तीसाठी उमेदवार उपलब्ध होतील तोपर्यंतचा कालावधी, यापैकी जो कमी कालावधी असेल तेवढया कालावधीसाठी सदर नियुक्त्या करण्यात याव्यात.

(ब) कराराचा कालावधी संपुष्टात येताच नियुक्ती संपुष्टात येईल व सदर पदावर केलेल्या सेवेमुळे अन्य कोणत्याही पदावर नियुक्ती मिळण्याचा/समावेशनाचा हक्क प्राप्त होणार नाही, ही बाब नियुक्ती आदेशात स्पष्ट करण्यात यावी.

(क) सदर पदावर नियुक्ती करताना मुंबई उच्च न्यायालयातील रिट याचिका क्र.८५/२००८ मध्ये मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशाचा भंग होणार नाही, अशा त-हेने नियुक्ती करण्यात येईल याची विभागाने दक्षता घ्यावी.

(ड) अशा प्रकारे करार नियुक्तीमुळे सद्य:स्थितीत शासन सेवेत असलेल्या कोणत्याही अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीच्या संधीवर प्रतिकूल परिणाम होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

(उ) या पदांवर नियुक्त करण्यात येणा-या अधिकारी/कर्मचा-यांना वरीलप्रमाणे वित्त विभागाने ठरवून दिलेल्या मर्यादेत ठोक मानधन देण्यात यावे.

(ऊ) सदर पदे सेवाप्रवेश नियमातील तरतूदींनुसार भरण्यात यावीत.

(च) सदर नियुक्ती केवळ तात्पुरत्या स्वरुपाची असून सदर अधिका-यांना कोणतीही सेवा सातत्य मिळण्याबाबत कोणताही हक्क राहणार नाही.

३. सदरचा खर्च हा गृह विभाग, "मागणी क्र.बी-१, २०५५ पोलीस,११६ न्यायसहायक विज्ञान (००)(०१) न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा (२०५५ ०३१९) "०१- वेतन" या लेखाशिर्षाखाली सन २०१७-१८ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८९/२०१७/का.१३, दि.१०.८.२०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८१८१२३४१२५९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sunil J Sovitkar

Digitally signed by Sunil J Sovitkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3d8ee31cf28155a3c297f1c4b60ba7aa7197b86c24ce4eb660c798a1afe6f9cc, cn=Sunil J Sovitkar
Date: 2017.08.18 12:24:01 +05'30'

**(सु.ज.सोवितकर)**
**उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
२. महासंचालक (न्यायीक व तांत्रिक), महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. प्रधान सचिव (विशेष), यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
५. संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/ पुणे/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ कोल्हापूर/नांदेड
९. उपसंचालक, प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, नागपूर/ पुणे/ औरंगाबाद/नाशिक/अमरावती/कोल्हापूर/नांदेड
१०.सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१३) मंत्रालय, मुंबई,
११.वित्त विभाग (व्यय-७) मंत्रालय, मुंबई-३२,
१२.निवडनस्ती/गृह विभाग (पोल-४).